**होर्डिंग व बॅनर्स डिजिटल पद्धतीने फ्लेक्सवद्वारे लावणे व हाताने रंगविण्याकरिता संस्थेस व दरास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१५/प्र.क्र. ४३/३४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३० जून, २०१५

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१२/प्र.क्र.२९१/३४, दिनांक १५ सप्टेंबर, २०१२

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१३/प्र.क्र.३३३/३४, दिनांक २७ नोव्हेंबर, २०१३

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मावज-२०१४/प्र.क्र.३६९/३४, दिनांक ३ डिसेंबर, २०१४

४) संचालक (प्रशासन), माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, यांचे क्रमांकः प्रदर्शने/हो.दर.सं./२०१४-१५/का.६/२५८, दिनांक निरंक चे पत्र.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या ध्येय- धोरणांची, विविध जनकल्याणकारी योजनांची / कार्यक्रमांची माहिती सामान्य जनतेस होण्यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या राज्यातील विविध ठिकाणी असणाऱ्या होर्डिंगचा वापर केला जातो. तसेच काही ठिकाणी बॅनर्स लावण्यात येतात. होर्डिंगवर मजकूर लावणे, काढणे, बॅनर तयार करणे व लावणे इत्यादी कामे करणाऱ्या संस्थेस व दरास संदर्भ क्र.३ या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. एकच संदेश सर्व राज्यात एकाच वेळी लावण्यासाठी कालावधी अपूरा पडतो. होर्डिंगवर संदेश फ्लेक्स डिजिटल पद्धतीने प्रिंटीग करुन लावण्याच्या कामाचे विकेंद्रीकरण केल्यास काम जलद गतीने होईल. सदर काम स्थानिक संस्थांकडून करुन घेतल्यास या कामाचे विकेंद्रीकरण करता येईल. ही वस्तूस्थिती लक्षात घेता, संदर्भ क्र.३ दिनांक ३ डिसेंबर, २०१४ च्या शासन निर्णयातील दरानुसार किंवा त्यापेक्षा कमी दराने काम करुन देण्यास इच्छूक स्थानिक संस्थाकडूनही काम करुन घेण्यास, या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६३०१६३९३४६३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2015.06.30 16:40:49 +05'30'

**(रा.ना.मुसळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२) महालेखापाल,१ /२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर,
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
५) संचालक (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मंबई,
६) संचालक (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मंबई,
७) उपसंचालक (वृत्त शाखा), (प्रकाशने), माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांजकडे प्रसिद्धीसाठी,
८) उप संचालक (प्रदर्शने), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९) उप संचालक (माहिती) महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
१०) सर्व उपसंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मंबई
११) सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
१२) निवड धारिका (का.३४),